**अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी पोलीस शिपाई भरतीपूर्व प्रशिक्षण योजनेच्या अंमलबजावणीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पोभप्र-२०१८/प्र.क्र.५२/का-९,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ सप्टेंबर, २०१८.

**वाचा** :-१) अल्पसंख्याक विकास विभाग,शा.नि. क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१८८/०९/का-१, दि.२७.७.२००९.
२) अल्पसंख्याक विकास विभाग,शा.नि. क्र. अविवि-२००९/प्र.क्र. १८८/०९/का-१, दि. २९.०८.२००९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या १५ कलमी कार्यक्रमातंर्गत दिलेल्या सूचनांनुसार अल्पसंख्याक समाजामधील उमेदवारांना स्पर्धात्मक परिक्षेमध्ये समान संधी मिळण्याच्या दृष्टीने तसेच शासकीय सेवेमध्ये अल्पसंख्याकांचे असलेले अत्यल्प प्रमाण विचारात घेऊन अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी पोलिस शिपाई भरती पूर्व प्रशिक्षण योजना संदर्भाधीन दि. २७ जुलै २००९ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. दिनांक २९.०८.२००९ च्या शासन निर्णयान्वये सदर योजनेमध्ये अंशत: सुधारणा करण्यात आल्या आहेत. सदर योजना महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या नियंत्रणांतर्गत जिल्हाधिकारी कार्यालयाकडून राबविण्यात येत होती. सदर योजना यापुढे महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगा ऐवजी अल्पसंख्याक विकास विभागाच्या नियंत्रणांतर्गत जिल्हाधिकारी कार्यालयाकडून राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी पोलीस शिपाई भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण योजना राबविण्यात येत आहे. सदर योजना महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे नियंत्रणाखाली जिल्हाधिकारी कार्यालयाकडून राबविण्यात येत होती. सदर योजना यापुढे अल्पसंख्याक विकास विभागाच्या नियंत्रणाखाली जिल्हाधिकारी कार्यालयाकडून राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त योजनेच्या अंमलबजावणीकरीता संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीमार्फत इच्छुक संस्थांकडून प्राप्त झालेल्या अर्जाची छाननी करुन आवश्यकतेनुसार स्थळ पाहणी करुन शिफारशीसह संस्थांची यादी अल्पसंख्याक विभागाकडे सादर करण्यात येईल. संस्थाची निवड करतांना अल्पसंख्याकांच्या शैक्षणिक संस्थांना प्राधान्य देण्यात येईल. अल्पसंख्याक विकास विभागाकडून प्रशिक्षण संस्थांची निवड अंतिम करुन त्याप्रमाणे जिल्हाधिकारी यांना कळविण्यात येईल.

३. पोलीस शिपाई भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण योजनेकरिता होणारा खर्च मागणी क्र. २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) (२२३५ ए २५८) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाअंतर्गत महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात येईल.

४. जिल्हाधिकारी कार्यालयाने प्रशिक्षण संस्थांसोबत केलेला करारनामा, प्रशिक्षण सुरु झाल्याबाबतचा अहवाल, प्रशिक्षणार्थींची यादी इ. कागदपत्रे अल्पसंख्याक विकास विभागास सादर केल्यानंतर सदर प्रशिक्षणासाठी निवड झालेल्या प्रशिक्षण संस्थांना वितरीत करावयाच्या निधीच्या रकमेचा संस्थानिहाय तपशिल अल्पसंख्याक विकास विभागाकडून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास उपलब्ध करुन देण्यात येईल. त्यानुसार आयोगाकडून संबंधित जिल्हाधिकारी यांना उक्त लेखाशिर्षातर्गत निधी वितरित करण्यात येईल. संबंधित जिल्हाधिकारी यांनी आवश्यकतेनुसार सदर रक्कम आहारित करुन प्रशिक्षण संस्थेस अदा करावी. यासाठी विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. सदर बाबतीतील लेखे विहित नमुन्यामध्ये आणि विहित पध्दतीनुसार ठेवण्यात येतील

यांव्यतिरिक्त सदर योजना राबविताना उपरोक्त शासन निर्णय २७ जुलै, २००९ व २९ ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या सर्व अटी शर्ती, कालावधी व अंमलबजावणीची कार्यपध्दती व इतर बाबी आहे तशाच लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९०४११२५२८७७१४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.09.04 11:27:26 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.राज्यालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा. मंत्री/ राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग,
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर,
८. पोलीस महासंचालक,
९. पोलीस आयुक्त (सर्व)
१०. विशेष पोलीस महानिरिक्षक (सर्व)
११. जिल्हा पोलीस अधिक्षक (सर्व)
१२. संचालक, लेखा व कोषागारे
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१५. सर्व विभागीय आयुक्त,
१६. सर्व जिल्हाधिकारी,
१७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१९. उपसचिव, वित्त विभाग व्यय-४, मंत्रालय, मुंबई
२०. उप सचिव, नियोजन विभाग- १४७५, मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती.